महाड येथील पूर नियंत्रणासाठी सावित्री नदीतील गाळ काढणाऱ्या सयंत्रासाठी इंधन खर्च उपलब्ध करुन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२२/प्र.क्र.०३/आव्यप्र-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई: ४०० ०३२.
दि. ११ मे, २०२२

**वाचा**:- १) जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिककरण, रायगड यांचे पत्र क्र. साशा/कार्या-१/ब-५/महाड पूर नियंत्रण/सयंत्राकरिता इंधन निधी मागणी/ २०२२, दि. ०१ मार्च, २०२२.

२) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील राज्य कार्यकारी समितीच्या दि. १० मार्च, २०२२ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

३) महसूल व वन विभागाचा शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२२/प्र.क्र.०३/आव्यप्र-१, दि. ३० मार्च, २०२२.

**प्रस्तावना**:-

महाड शहरात पूर परिस्थितीसाठी सावित्री नदीतील गाळ जमा झाल्याने उद्भवल्याचे निदर्शनास आले आहे. नदीतील गाळ काढणे व त्यामुळे पूर परिस्थितीचा प्रतिबंध करणे ही बाब सौम्यीकरणाच्या उद्दीष्टामध्ये येत असल्याचे पाटबंधारे विभागाने नेमलेल्या समितीच्या अहवालात नमूद करण्यात आले आहे. सदर गाळ काढण्यासाठी यंत्रसामुग्री जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी विभागाने यंत्रसामुग्री उपलब्ध करुन दिली असून त्या सयंत्रांना इंधन खर्चासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत संदर्भाधिन पत्रान्वये विनंती करण्यात आलेली आहे. राज्य कार्यकारी समितीने, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाने प्रस्तावित केलेल्या एकूण रु. ९.५५ कोटी खर्चापैकी २५% निधी उपलब्ध करुन देण्यास तत्वत: मान्यता दिली. त्यापैकी रु. १ कोटी निधी संदर्भाधिन क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आले. २५% निधीपैकी उर्वरित निधी रु. १.३८ कोटी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय**:-

सावित्री नदीतील जमा झालेला गाळ काढणे, ही आपत्ती सौम्यीकरणाची बाब असल्याने गाळ काढण्यासाठी वापरण्यात येणाऱ्या सयंत्रांना इंधन पुरवठा करण्यासाठी राज्य कार्यकारी समितीने मान्यता दिली असून त्यासाठी रु. १,३८,००,०००/- (रु. एक कोटी अडतीस लक्ष फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, रायगड यांना उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२.	या कामी होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ८० सर्वसाधारण (०१)(०१) महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाचे कार्यालय स्थापन करणे व फर्निचर व साधनसामुग्रीसह सुसज्जीकरण करणे (२२४५ १७६१) ३१ – सहायक अनुदाने या या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३.	अर्थसंकल्पिय वितरण प्रणाली (BDS) सदर निधी विभागीय आयुक्त, कोकण यांना वितरीत करण्यात येत असून तो जिल्हाधिकारी, रायगड यांना वितरीत करण्यात यावा.

४.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०५१११८४६२०७८१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(हितेंद्र दुफारे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत –

१) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
२) वित्तीय सल्लागार व सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
३) जिल्हाधिकारी, रायगड.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), ½, मुंबई.
५) महालेखापाल (लेखापरिक्षा), ½, मुंबई.
६) संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड.
८) प्रधान सचिव (आ.व्य., म. व पु.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९) निवड नस्ती, आव्यप्र-१.